
चिमुकल्यांची किमया..
ज्यॉं हेन्री फेबरनं रंगवलेलं..
कीटकांचं अद्भुत विश्व
लेखक : मॅथ्यु क्लार्क स्मिथ
आतील चित्रं : फेरी,
मराठी अनुवाद : नीलांबरी जोशी





पतंगाला एक सिक्स्थ सेन्स असतो. एक कीडा आपल्यापेक्षा दुप्पट वजनाच्या भुंग्याची शिकार करतो. कीटकांच्या अशा चित्रिविचित्र आयुष्याबद्दल प्रथम जगात कोणालाच फारसं ठाऊक नव्हतं. एका माणसानं मात्र त्या विश्वाचा जगाला परिचय करुन दिला.

या पुस्तकात तुम्हाला तो माणूस – ज्यॉं हेन्री फेबर भेटेल. जगातल्या महत्वाच्या जीवशास्त्रज्ञांपैकी तो एक होता. त्याचं आयुष्यही तो ज्या कीटकांवर संशोधन करत होता त्यांच्याइतकंच अनोखं होतं. लहानपणी फ्रान्समधल्या खेडेगावात रहाणारा हेन्री तासनतास कीटकांचं निरीक्षण करायचा. त्या कीटकांवर पूर्णपणे वेगळ्या तऱ्हेनं त्याला संशोधन करायचं होतं. मेलेल्या कीटकांवर कंटाळवाण्या पध्दतीत संशोधन करण्यापेक्षा जिवंत कीटकांचं निरीक्षण करणं त्याला जास्त योग्य वाटत होतं. असं संशोधन करुन त्याच्या हातात जी माहिती आली ती विलक्षण होती. क्षुद्र भासणाऱ्या कीटकांचं जग चांगलंच रहस्यमय होतं. त्यात चिक्कार नाट्यमयताही होती.



या पुस्तकात शब्द आणि रेखाटनं या दोन गोष्टींमधून जगाचा कीटकांकडे पहाण्याचा दृष्टिकोनच बदलून टाकणाऱ्या माणसाचं आयुष्य तुमच्यासमोर येईल.

फ्रान्सच्या दक्षिणेला एक सोनरी उन्हात चमकणारं गाव होतं. इतर गावांसारखंच तिथे कोंबड्या कुकडू कू अशी हाळी द्यायच्या, चर्चमधल्या घंटा वाजायच्या आणि आपल्याला काय करायचंय ते प्रत्येकाला माहिती होतं – फक्त एका माणूस सोडून..!

गावाच्या एका बाजूला उंच भिंतीं आणि गर्द झाडी यात लपलेलं एक गुलाबी रंगाचं घर होतं. त्या घरात एक म्हातारा माणूस रहायचा. त्याचे डोळे काळेभोर होते. तो एक काळी फेल्ट हॅट घालायचा आणि प्राण्यांबरोबर तासनतास बोलायचा. तो जादूगार आहे का वेडा आहे यावर लोकांचे एकमेकांत मतभेद होते.



भर दुपारी तळपत्या उन्हात तो बीटल्स हे कीटक खड्डा कसा खोदतात ते न्याहाळायचा.

काळयाकुट्ट रात्री तो झाडीत कोळी जाळं कसं विणतात ते पहायचा.

लहान मुलांना तो मेलेले सरडे आणि पाली आणून द्यायला प्रोत्साहन द्यायचा. मग त्यांना बागेत ठेवून ब्लू बॉटल या किड्यांना आकर्षित करायचा.



त्याच्या घरात तर यापेक्षा जास्त चित्रविचित्र गोष्टी आहेत अशा गावात अफवा होत्या. घरात विंचवांना पिंजऱ्यात ठेवलं होतं, घराच्या खिडक्या सदैव उघड्या असल्यानं मैना सहज आतबाहेर उडताना दिसायच्या. समुद्रात सापडणारे अनेक जीव जंतू तिथे क्रेटस् भरभरुन दिसायचे.

तो माणूस जेवताना सुरवंटांचा खिमा खायचा असंही एक जण सांगायचा. जसजसे दिवस जात होते तसतसं त्या व्यक्तीच्या रहस्यपूर्ण व्यक्तिमत्वाची ख्याती सगळीकडे पसरत होती.











मग तो माणूस खूप म्हातारा झाल्यावर पानगळीच्या दिवसात त्याच्या घरासमोर अचानक खूप साऱ्या मोटारगाड्या येऊन थांबल्या.

त्या काळया, उंची गाड्यांचा ताफा तर तिथे पोचलाच होता. पण त्यातून अनेक मान्यवर बाहेर पडले. त्यांच्यापैकी एक चक्क फ्रान्सचे राष्ट्रपती होते.

गावकरी एकमेकांमध्ये कुजबुजत त्या पाहुण्यांकडे पहात होते. राष्ट्रपती आणि कीटक अशा दोघांशी बोलणारा आपला रहस्यमय शेजारी कोण आहे ते त्यांना समजतच नव्हतं.

त्याचं नाव होतं ज्याँ हेन्री फेबर

संशोधन करताना माणसं निरनिराळे मार्ग अवलंबतात.

मि. फेबर यांनी सुमारे १०० वर्षांपूर्वी त्या पहाडाजवळ आपलं काम सुरु केलं होतं.



लहानपणी हेन्री शेतावरच्या एक जुनाट कौलारु घरात रहायचा. अनेक मैलांवर तिथे दुसरं घर नव्हतं. भोवतालच्या दलदलीतरी डुकरं, यायी, खडकाळ जमिनीत कसेबसे येणारे बटाटे आणि खुरट झुडपं यापलीकडे तिथे काहीच नव्हतं. संध्याकाळनंतर अंधार झाल्यावर भणाणणारं वारं आणि कोल्हेकुई ऐकत हेन्री झोपी जायचा.

इतरांसाठी ते दगडधोंडे, दलदल, गायीगुरं आणि शेणानं भरलेलं ठिकाण होतं. पावसाची उदास रिपरिप तिथे चालू असायची. मात्र इतरांना कठीण वाटत असलेल्या तिथल्या आयुष्यात हेन्रीला मात्र अनेक आश्चर्यं दिसायची.

हिरव्यागार पानावर तुरुतुरु चालणारा निळा किडा पाहून हेन्रीचे डोळेच विस्फारायचे.





तिथली भूछत्रं कोंबडीच्या अंड्यांसारखी सफेत, तुकतुकीत आणि मुलायम असायची.



हेन्री तिथे  दगडात लपलेल्या गोगलगायी शोधायचा..

सगळीकडे हिरे किंवा सोन्यासारखी जमलेली धूळ दगडांच्या आड लपलेली असायची.



अनेक वर्षांनंतर हेन्रीला त्या सगळयांची खरी नावं कळली. त्या नावांचा तो अक्षरश: जपचक रायचा, होप्लिया बीटल, अमानिटा मश्रुम. ॲमोनाईट फॉसिल, स्फटिक आणि मायका फ्लेक्स..!

आत्ता मात्र त्या सर्व अनामिक चमत्कारिक गोष्टी होत्या.

हेन्री सात वर्षांचा झाल्यावर त्यांचं कुटुंब शहरात स्थायिक झालं. तिथे हेन्री शाळेत जायला लागला. अर्थात तिथेही त्याला रोज काहीतरी अद्‌भुत गोष्ट दिसायचीच. जेव्हा त्याच्या वडिलांनी तळयातल्या बदकांना खायला घालायला पाठवलं तेव्हा हेन्री पूर्ण भिजूनच परत आला. त्याचे खिसे तलावातल्या खजिन्यानं ओसंडून वहात होते.

वर्गात जेव्हा इतर मुलं लॅटिन भाषेचा सराव करायची तेव्हा टेबलाच्या फटीत लपवलेल्या कीटकांबरोबर खेळायचा. त्याच्या डेस्कवर सगळीकडे अशा अजबगजब गोष्टी विखुरल्या होत्या.

हे सगळं हेन्री आपल्यापुरतंच ठेवायचा. कदाचित दुसऱ्या कोणाला सांगायला जावं तर त्यांना समजलंही नसतं म्हणा..! त्याचे शिक्षक विचारायचे – ग्रीक भाषा आणि गणित या विषयातले प्रश्न आ वासून समोर उभे असताना फुलांची चिरफाड करुन तुला काय मिळणार?





हेन्रीचे वडील नोकरी शोधायला अनेक शहरांमध्ये फिरले. पण त्यांना चांगली नोकरीच मिळेना.

हेन्री सोळा वर्षांचा झाल्यावर त्यानं नोकरी करायचा विचार केला. त्यानं मग रेल्वेत गॅंगमॅनचं काम केलं. बाजारात लिंबं विकली. फाके पडल्यावर अनेक दिवस तो रस्त्यावरच्या बागेतली द्राक्षं खाऊन जिवंत राहिला.

हेन्री जिथे नजर टाकेल तिथे छोटे छोटे किडे मकोडे त्याला आपल्याकडे ओढून घेत. भोवतालच्या चिखलानं भरलेल्या जमिनीत असंख्य प्रकारचे किडे होते - चमकदार बीटल्स, गुणगुणणारे भुंगे, भयानक गांधीलमाश्या इ.





अखेरीस हेन्रीला एका शाळेत शिक्षकाची नोकरी मिळाली. त्या काळोख्या वर्गात कोंदट हवा होती. त्यामुळे हेन्री अनेकदा आपल्या विद्यार्थ्यांना बाहेर मोकळया हवेत घेऊन जायचा. तिथे मुलं नाकतोड्यांचा गुं गुं असा आवाज आणि मातीत पोळं बनवणाऱ्या मधमाशांच्या पोळयातला मध काढून पीत असत.



लवकर एक महत्वाची गोष्ट हेन्रीच्या लक्षात आली. शिक्षकाची नोकरी सुरु झाल्यावर त्याला आपल्या लाडक्या कीटकांचा अभ्यास करायला वेळच मिळत नव्हता. मग काही वर्षं खास काही घडलंच नाही. मग त्याचं शाळेतल्याच मेरी या तरुण शिक्षिकेवर प्रेम बसलं आणि त्या दोघांनी लग्नही केलं. पण त्यांची पहिली दोन मुलं जन्मल्यावर मरण पावली. त्याचं हेन्रीला खूप दु:ख झालं. ते दु:ख विसरण्यासाठी तो परत एकदा कीटकांच्या दुनियेत मश्गुल झाला.

या दरम्यान त्यानं स्वत:चं कॉलेज शिक्षण पूर्ण करुन पदवी मिळवली. त्या वर्षीच्या हिवाळयात त्यानं एक लेख वाचला. तो वाचून कीटकांबद्दलचं त्याचं प्रेम परत जागृत झालं.

तो लेख एक गांधीलमाशीबद्दल होता. जी आपल्याहून दुप्पट आकाराच्या बीटलची शिकार करु शकत होती. गांधीलमाशी आपल्या घरट्यात अंड्यांबरोबर एक बीटल आणून सोडायची. का? तर पिलं जन्माला आल्यावर त्यांना खायला बीटलचा आहार तयार असायचा.

खरं तर तो बीटल मेलेला असायचा. पण घरट्यात तो ताजाच रहायचा. मृत्यू झाल्यावरही तो बीटल ताजातवाना राहील असं काय तंत्र त्या गांधीलमाशीकडे होतं?

याआधी हेन्रीनं कीटकांवर अनेक पुस्तकं वाचली होती. पण बहुतेक सगळी पुस्तकं कंटाळवानी होती. पण या लेखानं हेन्रीची कीटकांवर लिहायची इच्छा जागृत झाली. आपल्या लेखणीनं कीटकांची रहस्यं जगासमोर आणायला तो उत्सुक होता.



मग त्या खास सर्सरिस नावाच्या बीटलच्या तो शोधात निघाला. त्यानं त्यासाठी अनेक घरटी धुंडाळून शेकडो बीटल्स जमवले. त्या बीटल्सचा अभ्यास करायला ते घरात आणून ठेवले. तासनतास गवतात उकिडवा बसून तो बीटल्सच्या हालचालींचा अभ्यास करायचा. खूप विचार चिंतन मनन करुन त्याला सर्सरिसचं रहस्य कळलं.

प्रत्यक्षात गांधीलमाशी त्या बीटलला मारुन टाकत नव्हती. तर एका विशिष्ट जागी डंख मारुन त्याला पॅरॅलाईज करत होती. मग बीटल बेशुध्द व्हायचा. त्या अवस्थेतल्या बीटलला गांधीलमाशीची मुलं फस्त करायची.

हेन्रीच्या या शोधानं कीटकांवर संशोधन करणाऱ्या शास्त्रज्ञांच्या जगात एकच खळबळ माजली. अर्थात हा शोध लावणाऱ्या संशोधकाबद्दल ती खळबळ होती का संशोधनाबद्दल होती ते कोणालाच ठाऊक नव्हतं.

हेन्री जे काय शिकला होता ते ज्ञान दुसऱ्यांना द्यायला खूप उत्सुक होता. हेन्री मुलांना जे काय शिकवत होता त्यानं शिक्षणाधिकारी नाराज झाले. रक्तपिपासू मुंग्या? झुडुपांची उत्कट प्रेमकहाणी? हेन्री पाठ्यक्रमात काही बदल घडवू पहात होता. पण त्याआधीच त्याला नोकरी गमवावी लागली.





हेन्रीची पुढची काही वर्षं वाईटच गेली.

एके वर्षी कडाक्याची थंडी पडली आणि हेन्रीला न्यूमोनिया झाला. बिछान्यावर थंडीनं काकडत असताना आपण आता या आजारातून वाचणार नाही असा भयानक विचार त्याच्या मनात आला.

आपल्या प्रिय कीटकांचा निरोप घेतल्याशिवाय तो या जगाचा निरोप कसा काय घेणार होता? मग त्यानं आपल्या मुलाला बोलावून आपल्या पोळ्यात थंडीच्या दिवसांमुळे शांतपणे झोपलेल्या मधमाशांचं ठिकाण सांगितलं. मुलगा तिकडून मधमाशा घेऊन आल्या. त्या त्यानं वडिलांच्या बिछान्यावर ठेवल्या.

हेन्री त्या मधमाशांना हात लावणार इतक्यात त्या हालचाल करायला लागल्या. खोलीतल्या उबदार वातावरणानं त्यांची हालचाल सुरु झाली होती. त्यांनी आधी आपले पंख फडफडवले, मग पाय सरळ केले, मिशा हलवल्या. काही वेळातच त्या खिडकीवर भिरभिरायला लागल्या.

हे पाहून हेन्री पण ताजातवाना झाला. आपल्या आयुष्याला काहीतरी अर्थ आहे असं त्याला वाटायला लागलं. त्या अबोल कीटकांचं रहस्यमय आयुष्य जगासमोर आणायला त्यांना एका जिनियसची गरज होती.

त्यानंतर कित्येक आठवडे हेन्री अथकपणे कीटकांबद्दल लिहित होता. एखाद्या कवितेसारखे त्याला उत्स्फूर्तपणे शब्द सुचत. त्यानं पीकॉक मॉथ या पतंगाबद्दलही लिहिलं होयं. या पतंगाला एक सिक्स्थ सेन्स असतो. हेन्री बदामाच्या फांद्यांवरुन त्या पतंगांचे कोश (ककून) आणायचा. प्रत्येक कोश एका काचेच्या बरणीत ठेवून त्यातून पतंग बाहेर यायची वाट पहायचा.



जर पतंग मादी असेल तर एक मजेदार गोष्ट लक्षात यायची. रात्रीच्या वेळी मादीच्या गंधानं आकर्षित होऊन अनेक मैलांवरुन नर पतंग त्या काचेच्या बरणीतल्या मादी पतंगांकडे यायचे.

त्यानं प्रोसेशनरी केटरपिलर्सबद्दलही लिहिलं होतं. हे केटरपिलर्स एकमेकांना चिकटून एकत्र जथा तयार करायचे. शेवटच्या केटरपिलरची शेपटी सर्वात पहिल्या केटरपिलरच्या तोंडाला चिकटलेली असायची. ते रात्रंदिवस सरळ रेषेत प्रबास करायचे. हा जथा हेन्रीला फुलझाडांच्या कुंडीच्या वरच्या घेऱ्यावर सापडला होता. तो जथा त्या घेऱ्यावर गोल गोल फिरत रहायचा.





हेन्रीनं एम्पुसा – डेव्हलकिन या भयावह कीटकाबद्दलही लिहिलं होतं. या कीटकाचे पंजे एकदम टोकदार होते. डोक्यावर योध्द्यासारखं शिरस्त्राण होतं. मजा म्हणजे आपल्या जेवणाबाबत तो नाजुक कीटक फार चिकित्सक होता.

तसंच हेन्रीनं सिसिफस या गुबगुबीत – डंग बीटलबद्दलही लिहिलं. या बीटलची जोडी आदर्श मानली जाते.

ही जोडी आपल्या मुलांचं पोट भरण्यासाठी शेणाचा एक गोळा नर पाठीमागून आणि मादी पुढून असा जोर लावत घरट्यापर्यंत ढकलत ढकलत न्यायची.

हेन्रीनं अशा इतर डझनभर कीटकांबद्दल लिहिलं होतं. प्रत्येक किड्याची वेगळी सुरस कथा होती. वर्षं पुढे जात राहिली आणि संन्याशासारख्या व्रतस्थ अशा या लेखकाची कीर्ती दूरवर पसरत गेली.





यातून हेन्रीनं गरजेपुरती संपत्ती गोळा केली. मग त्यानं उराशी बाळगलेलं स्वप्न पूर्ण केलं. त्यानं गावाकडे वृक्षांच्या दाटीत आणि मोठ्या भिंतींआड लपलेलं एक गुलावी रंगाचं घर पाहिलं. त्या घरात हेन्रीनं कीटकांसाठी स्वर्ग निर्माण केला.

हेन्री जसजसं काम करायला लागला तसे ऋतू बदलत होते. पण प्रत्येक ऋतूमध्ये नवनवीन आश्चर्यं दिसायची. पण इतर माणसांनाही त्या गोष्टी तशाच आश्चर्यजनक वाटत होत्या का?

वयाच्या नव्वदाव्या वर्षी हेन्रीनं स्वत:ला एक प्रश्न विचारला. आपल्या आयुष्याकडे मागे वळून पाहिलं तर त्याला ते खडकाळ जमिनीवर उगवलेल्या मोहक फुलांसारखं वाटलं. आपल्या पुस्तकांमुळे एका वाचकाच्या मनात जरी कीटकांबद्दल प्रेम निर्माण झालं तरी आयुष्य सफल झाल्यासारखं त्याला वाटलं असतं.



मग एक दिवस फ्रान्समधल्या सर्व प्रमुख वृत्तपत्रांमध्ये एक बातमी छापून आली. फ्रान्सच्या सर्वात महान संशोधकाचा सन्मान करण्यासाठी इतर सारे शास्त्रज्ञ गोळा झाले. महान शास्त्रज्ञ कोण आहे यावर सगळयांचं एकमत होतं.. ज्यॉं हेन्री फेबर..! कीटकांच्या या कवीला नोबेल पारितोषिक जाहीर झालं. मग समितीनं विचारलं तो माणूस आहे तरी कुठे?

यानंतर सेरिगननच्या शेतकऱ्यांनी आपल्या आयुष्यात प्रथमच शेतं सोडून मोटारगाड्यांचा ताफा पाहिला.

त्या दिवशी फ्रान्सच्या राष्ट्राध्यक्षांच्या गाड्यांचा ताफा, गावातल्या सडकांवरुन धावला.

आपापलं काम करणारे गावकरी एक एक करुन गुलाबी रंगाच्या घराकडे धावले.



ते सगळे तिथे अगदी वेळेवर पोचले होते. त्या वेडसर, जादूगाराची सगळे पाहुणे आदरानं सरबराई करताना त्यांना दिसले.





*आपण माणूस असलो किंवा जनावर -  आपल्या प्रत्येकात काहीतरी विशिष्ट गुण असतोच.*

*एखाद्या मुलाला संगीतात रस असतो, एखाद्याला गणितात गती असते.*

*कीटकांच्या बाबतीत पण हेच सत्य आहे.*

*एखादी मधमाशी पानं कुरतडते तर एखादी मातीचं मस्त घर बनवते.*

*माणसातल्या या विशिष्ट गुणाला आपण जीनियस म्हणतो.*

*इंसानों में विशेष गुण को हम प्रतिभा (जीनियस) कहते हैं.*

*कीटकांच्या बाबतीत ते निसर्गदत्त (इन्स्टिंक्ट) म्हणतो.*

*इन्स्टिंक्ट ही कीटकांची प्रतिभा असते..!*

**- ज्याँ हेन्री फेबर**

## ऐतिहासिक संदर्भ :

१८०० च्या सुरुवातीला ज्याँ हेन्री कासिमिर फेबरच्या बालपणी झुडपांचा आणि प्राण्यांचा अभ्यास शास्त्रज्ञ प्रयोगशाळेत किंवा दूरवरच्या एखाद्या प्रांतात जाऊन करायचे. एंटेमॉलॉजी म्हणजे कीटकांचा अभ्यास मूठभर विशेषज्ञच करायचे. सर्वसाधारण लोकांना मधमाशा, भुंगे असे कीटक माहिती होते. पण एंटेमॉलॉजीच्या बहुतेक पुस्तकांमध्ये या कीटकांच्या बाबतीत माहिती अभावानं असायची. त्या पुस्तकांत किड्यांचं वर्णन आणि मोजमापं कंटाळवाण्या पध्दतीत ग्रीक, लॅटिन भाषेत असायची. त्या पुस्तकांमध्ये काही वेळा सुंदर किड्यांची चित्रंही असायची. पण ते मृतावस्थेतले मोहक किडे दूरवरच्या देशात असायचे.



जनावरांमधल्या विशेषत: कीटकांमधल्या हार्ड-वायर्ड हा प्रकार उजेडात आणला. कीटकांमध्ये असलेल्या हार्ड वायरिंग मुळेच आपण त्यांची वैशिष्ट्यं आणि गुणधर्म समजून घेऊ शकतो.
जसं गांधीलमाशी बीटलला डंख मारुन बेशुध्द करते आणि वाळवी जमिनीवर मोठ्या इमारती बांधते.
नंतर फेबरचे सगळे शोध प्रयोगशाळेत सिध्द झाले नाहीत. पण फेबरनं घालून दिलेल्या वाटेवरुन चालणारे त्याला बारकाईनं संशोधन करणारा आदर्श शास्त्रज्ञ मानतात. प्रसिध्द जीवशास्त्रज्ञ चार्ल्स डार्विन हा फेबरची प्रशंसा करायचा. त्याला फेबर एक असामान्य निरिक्षक वाटत होता.

फेबरनं केलेलं काम यापेक्षा खूपच वेगळं होतं. तो आपल्या आसपा

फेबरचं काम खूपच वेगळं होतं. तो आपल्या आसपासच्या बागांमध्ये, रस्त्यांवर, फ्रान्सच्या गावांमध्ये सापडणाऱ्या किड्यांचा अभ्यास करायचा. दुसरं म्हणजे, त्याला मेलेल्या किड्यांऐवजी जिवंत किड्यांच्या आयुष्याचा अभ्यास करायचा होता.
किड्यांच्या नैसर्गिक जीवनचक्राचा अभ्यास करताना फेबरनं अनेक अद्‌भुत शोध लावले. किडे एकमेकांत संवाद साधण्यासाठी फेरोमोन या रसायनाचा उपयोग करतात हे त्यानं प्रथम शोधून काढलं. हायपर मेटॅमॉर्फेसिस या अवस्थेचा शोध त्यानंच प्रथम लावला. या अवस्थेनुसार बी फ्लाय किंवा ब्लिस्टर बीटल्स हे किडे वाढताना वेगवेगळया अवस्थांमधून जातात.

संशोधक या नात्यानं फेबरनं खूप महत्वपूर्ण गोष्टी साध्य केल्या. पण इतर संशोधकांपेक्षा तो एका बाबतीत खूप वेगळा ठरला. ती गोष्ट म्हणजे – आपलं ज्ञान दुसऱ्याला देण्याची त्याची वृत्ती. केवळ इतर संशोधकांबरोबरच नव्हे तर जगातल्या तमाम लोकांसमोर त्यानं आपल्या शोधांना खजिना खुला केला. फेबरचं झुडपांच्या आणि कीटकांच्या आयुष्याच्या प्रत्येक गोष्टीवर केलेलं संशोधन आश्चर्यकारक होतं त्यामुळे संशोधकांनी ते लहान मुलं आणि महिला यांच्यापर्यंत पोचवायला मनाई केली. पण निसर्गातल्या सर्व गोष्टींकडे सर्व बाजूंनी पहायला हवं असं फेबरचं मत होतं. यात त्याचे कुटुंबिय सामील होते. फेबरच्या चढत्याउतरत्या काळात त्याच्या घरच्यांनी त्याला पूर्ण पाठिंबा दिला. किडे गोळा करण्यात, बागेची साफसफाई करण्यात आणि कीटकांना खायला घालण्यात त्याच्या कुटुंबियांनी त्याला कायम मदत केली.



फेबरनं दोनशेपेक्षा जास्त शोधनिबंध लिहिले. ज्यापैकी काही टेक्निकल होते. काही कविता होत्या. आपल्या आयुष्याच्या शेवटच्या काळात फेबर जिथे पोचला होता ते इतर शास्त्रज्ञांना स्वप्नवत वाटत होतं. साहित्याचं नोबेल मिळालेला बहुधा तो पहिला संशोधक होता. अनेकजण फेबरच्या एंटमॉलॉजिकल मेमरीज या कीटकांच्या यादीला क्लासिक मानतात. हे १० खंडातले ग्रंथ आहेत. ज्यात कीटक आणि निसर्ग याबद्दल सहजसोप्या आणि सुरेख भाषेत निबंध आहेत. फेबरचे हे खंड आणि इतर पुस्तकं आपण भोवतालच्या जगाकडे धैर्य आणि प्रेमाच्या नजरेतून पहायला हवं असं आवाहन करतात. असं केलं तरच चिमुकल्या किड्यांचं आश्चर्यकारक विश्व आपल्यासमोर येईल.
आजही फेबरबद्दल माहिती असणारे खूप कमी लोक आहेत. फेबर रहात होता त्या फ्रान्समध्येच फक्त लोकप्रिय आहे. त्याचं लहानपणीचं घर आता एक संग्रहालय आहे. त्याचबरोबर तिथे एक कीटकांचा पार्क आणि मिक्रोपोलिस ही शिक्षणसंस्थादेखील आहे. फेबरचं गुलाबी रंगाचं घरही आता एक संग्रहालय आहे आणि सेरिगननच्या त्याच्या बागेत सामान्य लोकही मुक्तपणे संचार करु शकतात. फेबरनंतर गेल्या २०० वर्षात जग झपाट्यानं बदलत चाललं आहे. फेबरचे अनेक प्रिय कीटक, प्राणी आणि झुडपं यांच्या प्रजाती नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत. त्यामुळे आज फेबरनं दिलेल्या संदेशाला जास्त महत्व आहे.



टाईमलाईन

1823 ज्यॉं हेन्री फेबरचा फ्रान्समधल्या सेंट लेआॉस मध्ये जन्म..
1826 मलावल या गावात फेबरला आजीआजोबांबरोबर रहायला पाठवलं.
1828 फ्रान्समध्ये पहिला राष्ट्रीय रेल्वेमार्ग
1830 सेंट लेआॉसमध्ये परत येऊन शालेय शिक्षणाला सुरुवात
1832 फेबरचं कुटुंब रोडेज या शहरात स्थायिक झालं. वडिलांनी कॉफी हाऊस थाटलं
1838 सॅम्युएल मार्सनं टेलिग्राफचा पहिला सार्वजनिक डेमो दिला.
1839 फेबरनं शाळा सोडून काम करायला सुरुवात केली
1842 फेबरनं शिक्षक बनण्यासाठी पात्र ठरुन कारपेनत्रासमध्ये शिक्षकाची नोकरी धरली
1844 मेरी सिसरीन विल्लार्ड या शिक्षिकेसोबत फेबरनं लग्न केलं.
1848 फ्रान्स राज्यक्रांती होऊन तिसऱ्या लुईस राजाची सत्ता उलथून नेपोलियन सत्तेवर आला
1849 फेबरला कॉर्सिका बेटावर भौतिकशास्त्राच्या शिक्षकाची नोकरी मिळाली
1853 कॉर्सिकातली नोकरी संपवून अविग्नॉनमधल्या शाळेत शिकवायला फेबरनं सुरुवात केली
1855 सर्सरिस बीटल आणि शिकार करण्याची तिची पध्दत यावर पहिला शोधनिबंध प्रकाशित झाला.
1859 चार्ल्स डार्विनचं “ओरिजिन ऑाफ स्पिशिज” प्रकाशित झालं.
1865 अमेरिकेतलं यादवी युध्द संपलं.
1866 अविग्नॉन नॅचरल हिस्ट्री म्युझिमय आणि संध्याकाळी लोकांना शिकवणं
1870 फेबरच्या लोकप्रियतेवर वादंग. फेबर आॅरेंज सिटीत रहायला गेला.
1876 अलेक्झांडर ग्रॅहॅम बेलनं टेलिफोनचा शोध लावला.
1877 ज्युल्स या फेबरच्या मुलाचा १६व्या वर्षी दुर्दैवी अंत
1878 फेबरला न्यूमोनिया होऊन तो मरता मरता वाचला.
1879 सेरिगनन या ठिकाणी फेबर रहायला गेला. तिथे हरमास नावाचं घर घेऊन लेखन सुरु केलं.
1889 पॅरिसमध्ये आयफेल टॉवर्स बांधला.
1903 राईट बंधूंनी पहिलं विमान उडवलं.
1912 फेबरला साहित्यातलं नोबेल मिळाल्याची घोषणा
1913 रेमंड पॉम्नर या फ्रान्सच्या राष्ट्रपतींनी हरमासला येऊन फेबरला नोबेल दिलं.
1914 पहिल्या महायुध्दाची सुरुवात
1915 वयाच्या ९२व्या वर्षी फेबरचं निधन

# लेखकाचं मनोगत

हे पुस्तक लिहिण्यापूर्वी मी आवड म्हणून निसर्गविज्ञानाचा अभ्यास करत होतो. मला कीटकांमध्ये विशेष रस होता. मी शाळेत जीवशास्त्र शिकलो होतो आणि अनेक वर्षं पर्यावरणावर शिकवलं होतं. तरीही मला ज्यॉं हेन्री फेबरबद्दल काहीच माहिती नव्हतं. मफ फेबरबद्दल जाणून घ्यायचे प्रयत्नही कदाचित केले नसते. पण मला एक दिवस माझ्या बागेत एक विचित्र गोष्ट दिसली. एक काळया रंगाची गांधीलमाशी एक मोठा केटरपिलर फुलांच्या ताटव्याकडे वाहून नेत होती. ती कुठे चालली असेल? तो केटरपिलर मेलेला होता का? हे जाणून घ्यायची मला प्रबळ इच्छा झाली. पण मी खूप बिझी होतो. मग गांधीलमाशीला मी तिथेच सोडलं. मग त्या विचित्र गोष्टीचं कारण इंटरनेटवर शोधलं.

काही तासांमध्ये मला विलक्षण माहिती कळली. फेबर या माणसानं इंटरनेटच्या आधी दीडशे वर्षांपूर्वी या सगळया प्रश्नांची उत्तरं शोधली होती. त्याच्याकडे फक्त दोन डोळे आणि सर्वसाधारण उपकरणं होती. ती उपकरणं कोणीही आपल्या हातानं बनवू शकला असतात. मला यामुळे प्रेरणा मिळाली आणि मी चक्रावलोही. एक गरीब शेतावर काम करणारा मुलगा, पैसे नसताना, प्रगत उपकरणं नसताना आणि कोणताच वशिला नसताना जगातला महत्वाचा संशोधक कसा बनला? मला या महान संशोधकाबद्दल आधीच का कळलं नाही? माझ्या डोक्यात या विचारांची चक्रं फिरायला लागली. या प्रश्नांच्या उत्तरांचा शोध घेण्यासाठी हे पुस्तक मी लिहिलं. फेबरचा वारसा जिवंत ठेवायला हे छोटेखानी पुस्तक मदत करेल अशी मला आशा आहे. या पुस्तकातून फेबर जगातल्या प्रत्येक माणसापर्यंत पोचावा ही माझी तळमळ आहे.



